मुंबई नागरी परिवहन प्रकल्प-३ (एमयुटीपी-३) करिता एआयआयबी बँकेकडून प्राप्त झालेली अर्थसहाय्याची रक्कम मुंबई रेल्वे विकास महामंडळास वितरीत करण्याबाबत (सन २०२४-२५)

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२४/प्र.क्र.८४/नवि-७**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :-१० फेब्रुवारी, २०२५.**

**पहा :-**

१. रेल्वे मंत्रालय (रेल्वे बोर्ड), भारत सरकार कार्यालयीन ज्ञापन क्र.२०१३/Proj./MRVC/MUTP-III/१५/१Vol.I, दि. २०.१२.२०१६.
२. नगर विकास विभाग शासन निर्णय क्र.एमयुटीपी-३३१३/प्र.क्र.१३०/नवि-७ दिनांक ०७ जानेवारी, २०१७.
३. महाराष्ट्र शासन, एमआरव्हीसी, एमएमआरडीए व सिडको यांच्यादरम्यान स्वाक्षांकित दुय्यम वित्तीय करारनामा व पुरक करारनामा दि. ९ जुलै, २०२०.
४. भारत सरकार व एआयआयबी बँक यांच्या दरम्यान स्वाक्षांकित कर्ज करारनामा दि. २४.०८.२०२०.
५. एआयआयबी बँक, महाराष्ट्र शासन व एमआरव्हीसी यांच्या दरम्यान स्वाक्षांकित प्रकल्प करारनामा दि. २४.०८.२०२०.
६. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: एमआरडी-३३२४/प्र.क्र.८४/नवि-७, दि. २७.१२.२०२४.

**<u>प्रस्तावना</u> :**

मुंबई व उपनगर रेल्वे सेवेमध्ये अधिक सुधारणा करण्याच्या अनुषंगाने मुंबई नागरी परिवहन प्रकल्प (एमयुटीपी) टप्पा-३ या रु.१०,९४७ कोटी प्रकल्प पुर्णत्व किमंतीच्या प्रकल्पास केंद्रीय मंत्रिमंडळाने दि. ३०.११.२०१६ रोजी मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने सदर प्रकल्पास रेल्वे मंत्रालयाने संदर्भाधीन क्र.१ येथील दि. २०.१२.२०१६ रोजीच्या पत्रान्वये सदर प्रकल्पास मान्यता दिली आहे. राज्य शासनाने संदर्भाधीन क्र. २ येथील दि. ०७.०१.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये एमयुटीपी-३ प्रकल्प भारतीय रेल्वेच्या सहभागाने मुंबई रेल्वे विकास महामंडळामार्फत मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-१ व टप्पा- २च्या धर्तीवर ५०:५० आर्थिक सहभागातून राबविण्यास मान्यता दिली आली आहे. या प्रकल्पांतर्गतची कामे एशियन इन्फ्रास्ट्रक्चर इन्व्हेस्टमेंट बँक (एआयआयबी) वित्तीय सहाय्यातून हाती घेतली असून सदर प्रकल्पाकरिता एआयआयबी बँकेने रु.३५०० कोटी (युएसडी ५०० मिलीयन) कोटी इतके कर्ज मंजूर केले आहे. यानुषंगाने भारत सरकार व एआयआयबी बँक यांच्या दरम्यान कर्ज करारनामा व एआयआयबी बँक, महाराष्ट्र शासन व एमआरव्हीसी यांच्या दरम्यान प्रकल्प करारनामा दि. २४.०८.२०२० रोजी स्वाक्षांकित करण्यात आले आहेत.

एमआरव्हीसीमार्फत बाह्य कर्जाच्या घटक प्रकल्पांवर खर्च करण्यात आला असल्यास अशा खर्चाची पुर्तता एमएमआरडीएमार्फत करावयाची आहे. एमआरव्हीसीने केलेल्या खर्चाचे प्रतिपूर्ती दावे एआयआयबी बँकेस सादर करते. एआयआयबी बँकेने सदर प्रतिपूर्ती दावे मंजूर केल्यानंतर तेवढीच रक्कम एआयआयबी बँकेकडून कर्ज स्वरूपात केंद्र शासनास वितरीत केली जाते. त्यामधील राज्य

शासनाच्या हिश्श्याची कर्ज रक्कम केंद्र शासनामार्फत राज्य शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा करण्यात येते. राज्य शासनाच्या कर्ज हिश्श्यापोटी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने मुंबई रेल्वे विकास महामंडळास उपलब्ध केलेल्या निधीपोटी केंद्र शासनाकडून अतिरिक्त केंद्रीय सहाय्य म्हणून महाराष्ट्र शासनास प्राप्त होणारी एआयआयबी कर्जाची रक्कम राज्य शासनाकडून एमएमआरडीएला वितरीत करावयाची आहे. रेल्वेकडून उपनगरीय रेल्वे प्रवास तिकीटावर अधिभार आकारण्यात येऊन सदर अधिभारापोटी जमा होणारी रक्कम ही या प्रकल्पासाठी एआयआयबीकडून घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीसाठी तसेच कर्जाच्या बदल्यात घेतलेल्या लीज वरील शुल्काचे प्रदान करण्यासाठी वापरावयाची आहे. सन २०२४-२५ च्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून रु.६३.१४२८ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> -**

०१. मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३ यासाठी केंद्र शासनाकडून (AIIB Loan No.L०२२८A) प्राप्त झालेल्या अतिरिक्त केंद्रीय सहाय्याच्या रक्कमेपोटी सन २०२४-२५ या चालू वित्तिय वर्षामध्ये सदर प्रयोजनाकरीता रु.३०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित आहे. सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीत तरतुदीमधून **रु.६३,१४,२८,०००/- (अक्षरी रुपये त्रेसष्ट कोटी चौदा लाख अठ्ठावीस हजार फक्त)** इतकी रक्कम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत मुंबई रेल्वे विकास महामंडळास वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदरचे निधी वितरण हे **बिनशर्त** स्वरुपाचे आहे.

०२. उपरोक्त परिच्छेदामध्ये नमूद रक्कम "मुख्य लेखाशिर्ष-२२१७-मागणी क्रमांक एफ-२, ८०, सर्वसाधारण, १९१ महानगरपालिकांना सहाय्य, केंद्र सहाय्यित योजना मुंबईच्या विकासाकरिता विशेष कार्यक्रम (००) (३७) मुंबई नागरी परिवहन प्रकल्पासाठी अतिरिक्त केंद्रीय सहाय्य (२२१७१२४१), ३१ सहाय्यक अनुदाने-वेतनेत्तर" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

०३. सदरहू लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव नवि-५ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. याबाबतच्या खर्चामेळाची कार्यवाही नवि-३१ कार्यासनाने करावी. शासन निर्णयातील अनुक्रमांक क्र.१ मध्ये नमूद करण्यात आलेली रू.६३.१४२८ कोटी रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरीत करुन ती मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोख शाखेने देयक तयार करून ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे.

०४. मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३ (AIIB Loan No.L०२२८A) यासाठी प्राप्त झालेली सदर अतिरिक्त केंद्र सहाय्याची रक्कम एमएमआरडीएने संबंधित कार्यान्वयीन संस्थेला म्हणजेच मुंबई रेल्वे विकास महामंडळास त्वरित वितरीत करावी.

०५. याबाबत मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने स्वतंत्र लेखे ठेवावेत व सदर प्रकल्पाच्या करारानुसार मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण/सिडकोकडून संबंधित कार्यान्वयीन संस्थेला उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या निधीचे संनियंत्रण करावे.

०६. सदर प्रकल्पासाठी राज्य शासनाकडून वितरीत करण्यात येणारा निधी, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण व सिडको यांचा वित्तीय सहभाग याबाबतचा लेखाजोखा मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने व मुंबई रेल्वे विकास प्राधिकरणाने ठेवावा.

०७. मुंबई उपनगरीय रेल्वे प्रवाशी तिकीटावरील अधिभारापोटी जमा होणाऱ्या रक्कमेचा तपशील वेळोवेळी प्राप्त करून घेऊन मुंबई रेल्वे विकास महामंडळाने दर तीन महिन्याला नगर विकास विभाग तसेच वित्त विभागास सादर करावा.

०८. मुंबई नागरी परिवहन प्रकल्पांकरीता एआयआयबी बँकेकडून प्राप्त होणा-या कर्जाची मुद्दल व त्यावरील व्याजाची परतफेड करारनाम्यातील वेळापत्रकानुसार राज्य शासनास होईल याची मुंबई रेल्वे विकास महामंडळाने खबरदारी घ्यावी.

०९. शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय मुंबई नागरी परिवहन प्रकल्प टप्पा-३ मधील राज्य शासनाच्या मंजूर हिश्श्यापेक्षा अधिकचा निधी उपलब्ध होणार नाही, याची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण व सिडको यांनी खबरदारी घ्यावी.

१०. सदर प्रयोजनार्थ राज्य शासनाकडून एमयुटीपी-३ प्रकल्पाकरीता आतापर्यंत **रू. ७५९.०८७६ कोटी** इतका निधी कर्ज सहाय्य म्हणून वितरीत करण्यात आला आहे. सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणे :-

| अनु.क्र. | दिनांक | रक्कम (रु. कोटी) | निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव | एकूण वितरीत निधी (रु. कोटी) |
|---|---|---|---|---|
| १ | ३०.०३.२०२१ | १५.०३४४ | राज्य शासन | १५.०३४४ |
| २ | २७.१०.२०२१ | १३.५४६७ | राज्य शासन | २८.५८११ |
| ३ | ०८.०३.२०२२ | ६.८६०३ | राज्य शासन | ३५.४४१४ |
| ४ | ३०.०३.२०२२ | १६.९०७३ | राज्य शासन | ५२.३४८७ |
| ५ | १०.०८.२०२२ | ४५.२२७८ | राज्य शासन | ९७.५७६५ |
| ६ | १९.०९.२०२२ | २९.७७२२ | राज्य शासन | १२७.३४८७ |
| ७ | १४.०३.२०२३ | ३६.७६२२ | राज्य शासन | १६४.११०९ |
| ८ | २४.०३.२०२३ | ४५.४०८५ | राज्य शासन | २०९.५१९४ |
| ९ | ३१.०३.२०२३ | १३९.८२९३ | राज्य शासन | ३४९.३४८७ |
| १० | १०.१०.२०२३ | ५.२८४६ | राज्य शासन | ३५४.६३३३ |
| ११ | २९.१२.२०२३ | ४४.७१५४ | राज्य शासन | ३९९.३४८७ |
| १२ | २६.०२.२०२४ | २००.०००० | राज्य शासन | ५९९.३४८७ |
| १३ | ०३.१०.२०२४ | ३५.८६८५ | राज्य शासन | ६३५.२१७२ |
| १४ | २७.१२.२०२४ | १२३.८७०४ | राज्य शासन | ७५९.०८७६ |
| १५ | सदरचे वितरण | ६३.१४२८ | राज्य शासन | **८२२.२३०४** |

११. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ मधील संबंधित सर्व अटींचे तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१२ सदर निधी वितरण आदेश वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.३७/व्यय-३, दि.०४/०२/२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१०१८२७५२८४२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.02.10 18:29:07 +05'30'

**[विजय चौधरी]**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,वांद्रे-कुर्ला संकुल,वांद्रे (पूर्व),मुंबई-५१
६. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई रेल्वे विकास महामंडळ, चर्चगेट, मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक तथा उपाध्यक्ष, सिडको, निर्मल भवन, नरिमन पॉईंट, मुंबई.
८. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
१०. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
११. अधिदान व लेखाधिकारी मुंबई
१२. वित्त विभाग (व्यय-३), अर्थसंकल्प-१५, अर्थसंकल्प-३.
१३. वित्त विभाग (साधन संपत्ती/अर्थोपाय).
१४. नियोजन विभाग (कार्यासन १४४४) (कार्यासन १२११ ).
१५. कक्ष अधिकारी नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .
१६. कक्ष अधिकारी नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ .
१७. कार्यासन नवि-५ (रोख शाखा) (३ प्रती),
१८. निवड नस्ती, नवि-७.